जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची (Programme Implementation and Monitoring Committee PIMC) पुर्नरचना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्र.: अंश्रनि २०१६/प्र.क्र. ३३०/सामासु**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ५ जानेवारी, २०१७

वाचा :- १) महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समुळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम -२०१३.
२) संस्थापक/प्रवक्ता अखिल भारतीय अंधश्रध्दा निर्मुलन समिती यांचे दिनांक ३.७.२०१४ चे पत्र.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र. अंश्रनि-२०१४/प्र.क्र. २९३/सामासु, मंत्रालय, दि. १२ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावनाः**

भारतीय समाजात रुजलेल्या काही अनिष्ट, अघोरी, अमानुष संस्कारातून रुजलेल्या अनेक प्रकारच्या गैरसमजुतीमुळे समाजाचे अतोनात नुकसान होत असल्याचे दिसून येत आहे. लाखो माणसांचे जीव वाचविण्यासाठी त्यांचे होणारे शोषण व छळ थांबविण्यासाठी व समाजाचे मानसिक स्वास्थ सुधारण्यासाठी शासनाने दि. २० डिसेंबर, २०१३ रोजी महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३ जारी करण्यात आला आहे.

जादुटोणा विरोधी कायद्यामुळे लाखो माणसांचा होणारा छळ, शोषण व त्यांचे जीव वाचणार आहेत. त्याकरिता समाजप्रबोधन करुन महाराष्ट्र राज्यातील सामान्य जनतेच्या मनातील गैरसमजुती दूर करणे गरजेचे आहे. संस्कारातून रुजलेल्या गैरसमजुतीमुळे जातीयता, उच्चनिचता, गटपंथांमधील परस्पर द्वेष, स्त्री-पुरुष असमानता, दारिद्र अशा मानवतेसाठी घातक असणा-या गोष्टी अजूनही समाजात अस्तित्वात आहेत. त्यात बदल होणे आवश्यक असून त्यासाठी जादूटोणा विरोधी कायद्याच्या प्रचार प्रसारासह त्याची अंमलबजावणी होणे गरजेचे आहे. त्या अनुषंगाने जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलजबावणी समिती (Programme Implementation and Monitoring Committee PIMC) संदर्भाकिंत क्रमांक ३ शासन निर्णय दि. १२ ऑगस्ट, २०१४ अन्वये गठीत केलेल्या समितीची पुर्नरचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष, अनिष्ट व अघोरी प्रथा व जादुटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३ दि. २० डिसेंबर, २०१३ रोजी जारी केलेला आहे. सदर कायद्याची परिणामकारक व योग्य अंमलबजावणी करण्यासाठी मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांच्या अध्यक्षतेखाली जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समितीची (Programme Implementation and Monitoring Committee PIMC) पुर्नरचना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

**जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणी समिती**
(Programme Implementation and Monitoring Committee PIMC)

| अ.क्र. | नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री (सामाजिक न्याय) | अध्यक्ष |
| २. | मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) | उपाध्यक्ष |
| ३. | सचिव (सामाजिक न्याय विभाग) | सदस्य |
| ४. | सचिव, गृह विभाग | सदस्य |
| ५. | सचिव, विधी व न्याय विभाग | सदस्य |
| ६. | सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ७. | सचिव, शालेय शिक्षण, युवा व क्रीडा विभाग | सदस्य |
| ८. | सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य |
| ९. | सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग | सदस्य |
| १०. | सचिव, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ११. | सचिव, ग्रामविकास विभाग | सदस्य |
| १२. | सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| १३. | सचिव, माहिती व जनसंपर्क विभाग | सदस्य |
| १४. | सचिव, महिला व बालविकास विभाग | सदस्य |
| १५. | सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| १६. | श्री. श्याम मानव | सह अध्यक्ष |
| १७. | श्री. अविनाश पाटील, धुळे | सदस्य |
| १८. | श्री. पुरुषोत्तम आवारे पाटील | सदस्य |
| १९. | श्री. सुरेश झुरमुरे | सदस्य |
| २०. | श्रीमती छाया सावरकर | सदस्य |
| २१. | श्रीमती मुक्ता दाभोळकर, रत्नागिरी | सदस्य |
| २२. | श्री. माधव वावगे, मुंबई | सदस्य |
| २३. | आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |

सदर समितीची बैठक वर्षातून किमान २ वेळा होईल. समितीतील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाने निर्धारित केलेले भत्ते नियमानुसार अनुज्ञेय राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०५१५३६४७४७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2017.01.05 15:40:40 +05'30'

**(ज्ञा. ल. सुळ)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
३) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहाय्यक,
४) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मुंबई.
७) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
८) सर्व विभागीय आयुक्त, मुंबई
९) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) सर्व पोलिस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व पोलिस आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग,
१४) स्लव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी / सहायक आयुक्त, समाजकल्याण
१६) सर्व संबंधित जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अमंलबजावणी समिती सदस्य.
१७) निवड नस्ती, का-सामासु.

************************